अपंग व्यक्ती [समान संधी, हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग] कायदा, १९९५ [१९९६ चा पहिला] च्या कलम ६० [१] अन्वये अपंग व्यक्तींसाठी आयुक्त नियुक्त करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
शासन निर्णय क्रमांक: इडीडी-१०९६/४७४३१/प्र.क्र.६६६/सुधार-२.
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ७ फेब्रुवारी, १९९८.

**शासन निर्णय** :- अधिसूचना क्रमांक: इडीडी-१०९६/४७४३१/प्र.क्र.६६६/सुधार-२, दिनांक ७ फेब्रुवारी, १९९८ अन्वये अपंग व्यक्ती [समान संधी, हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग] कायदा, १९९५ [१९९६ चा पहिला] च्या कलम ६० [१] अन्वये उप सचिव, समाजकल्याण विभाग, महाराष्ट्र शासन यांना मा. राज्यपाल महोदयांच्या अनुमतीने अपंग व्यक्तींसाठी आयुक्त म्हणून घोषित करण्यात आले आहे.

या अधिसूचनेद्वारे समाजकल्याण विभागातील अपंग कल्याणाचे काम पहाणारे उप सचिव, श्री. श्रा. का. पाईकराव यांना या शासन निर्णयान्वये अपंग व्यक्तींसाठी आयुक्त म्हणून अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येत आहे. त्यांनी अपंग व्यक्ती [समान संधी, हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग] कायदा, १९९५ च्या कलम ६१ मध्ये नमूद केलेल्या खालील जबाबदाऱ्या व कर्तव्ये पार पाडणे अत्यावश्यक आहे.

[१] अपंग व्यक्तींसाठी राबविण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रम व योजनांसाठी शासनाच्या संबंधित विभागांशी संपर्क साधणे.

[२] राज्य शासनामार्फत वितरीत करण्यात येत असलेल्या निधीच्या उपयोगाबाबत संनियंत्रण ठेवणे.

[३] अपंग व्यक्तींना उपलब्ध करून देण्यात आलेल्या सुविधा व हक्क यांचे संरक्षण करण्यासाठी पावले उचलणे.

[४] अपंग व्यक्ती कायद्याच्या अंमलबजावणीबाबत राज्य शासनाला ठराविक कालावधीनंतर अहवाल सादर करणे व त्याची एक प्रत मुख्य आयुक्त, नवी दिल्ली यांच्याकडे पाठविणे.

सदर कायद्याच्या कलम ६२ व ६३ मध्ये नमूद केलेले सर्व अधिकार श्री. पाईकराव, आयुक्त, अपंग व्यक्ती यांना प्रदान करण्यात येत आहेत. याशिवाय राज्य शासनामार्फत सोपविण्यात आलेली कर्तव्ये व जबाबदाऱ्या श्री. पाईकराव यांनी पार पाडणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-

[ जे. पी. डांगे ]
सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता], मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
श्री. श्रा. का. पाईकराव, उप सचिव, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

निवड नस्ती/का. सुधार-२.